सहायक संचालक (माहिती)/ माहिती
अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने,
गट-ब या संवर्गात पदोन्नती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन आदेश क्रमांकः मावज-२०१६/प्र.क्र.१६९ (१०) /३४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१७

वाचा :- शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मावज-२०१४/७६०/प्र.क्र.२१९/३४-अ,
दि. १२.०८.२०१५

**शासन आदेश :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील खालील नमूद अधिकाऱ्यांना संदर्भाधीन शासन आदेशान्वये सहायक संचालक (माहिती)/ माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने, गट-ब ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४००) या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली होती. सदर अधिकाऱ्यांना आता खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांची पदस्थापना त्यांच्या सध्याच्याच पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व वर्तमान पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण, महसूली विभाग व नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती वृषाली पाटील, सहायक संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुख्यालय, मुंबई | खुला | सहायक संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुख्यालय, मुंबई |
| २ | श्री. संतोष तोडकर, सहायक संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर (सध्या प्रतिनियुक्तीने माहिती अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई) | खुला | सहायक संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर (सध्या प्रतिनियुक्तीने माहिती अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई) |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व वर्तमान पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण, महसूली विभाग व नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|---|
| ३ | श्री. इरशाद बागवान, सहायक संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुख्यालय, मुंबई | इ.मा.व. | सहायक संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुख्यालय, मुंबई |

**अटी व शर्ती -:**

१) वरील अधिकाऱ्यांना सहायक संचालक (माहिती)/ माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने, गट-ब या पदावरील पदोन्नती ही तात्पुरती पदोन्नती असून ती मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक २७९७/२०१५ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती ही निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मिळणाऱ्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३१२०४२२०७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2017.03.31 20:43:37 +05'30'

**(रा. ना. मुसळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई,

५. संचालक (माहिती)(प्रशासन)/ (वृत्त व जनसंपर्क)/ (माध्यम समन्वयक), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
७. उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर,
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
१०. संबंधित अधिकारी (मावज मार्फत),
११. निवडनस्ती.